जिल्हा महिला व बाल रुग्णालय सिंधुदूर्ग - कुडाळ येथील नविन इमारतीमध्ये रुग्णालयीन कामकाज सुरु करण्यासाठी अंतर्गत कामे, पाणी पुरवठा व जोडरस्ता इ. कामांचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०२०/ प्र.क्र.१६२/ आरोग्य-४**
मंत्रालय, १० वा मजला, संकुल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख : १७ ऑगस्ट, २०२०.

**वाचा :- सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/कक्ष-३/ टे-६/ जिस्त्रीरुकुडाळविविधकामे/५५४६-४७/२०, दि.३०.०७.२०२०.**

**प्रस्तावना :-**

जिल्हा महिला व बाल रुग्णालय, सिंधुदूर्ग-कुडाळ येथील नवीन इमारतीमध्ये रुग्णालयीन कामकाज सुरु करण्यासाठी अंतर्गत कामे, पाणी पुरवठा व जोडरस्ता इ. कामाचे अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कुडाळ; उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.२, कणकवली, सिंधुदूर्गनगरी; जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, सिंधुदूर्ग व उपसंचालक, आरोग्य सेवा कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांनी प्रमाणित केले आहे. सदर अंदाजपत्रक सन २०१९-२० च्या दरसूचिवर आधारित आहे. या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

जिल्हा महिला व बाल रुग्णालय, सिंधुदूर्ग-कुडाळ येथील नवीन इमारतीमध्ये रुग्णालयीन कामकाज सुरु करण्यासाठी अंतर्गत कामे, पाणी पुरवठा व जोडरस्ता इ. कामांच्या एकूण रु.१००.०० लाख (रुपये १ कोटी फक्त) च्या अंदाजपत्रकास खालील प्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | रुग्णालयीन कामे | रुपये |
|---|---|---|
| १ | रुग्णालय रंगकाम | रु.१५,७७,६७९/- |
| २ | बाह्य पाणी पुरवठा | रु.६,९०,०१८/- |

| | | |
|---|---|---|
| ३ | प्लॉट लेवलींग व जोडरस्ता | रु.७,०७,४७०/- |
| ४ | पार्टीशन, दरवाजे, किचन, बेसीन नळ इत्यादी | रु.६०,६७,६५०/- |
| ५ | मीटरींग की ऑस्क | रु.९,५०,०००/- |
| | एकूण | रु.९९,९२,८१७/- |
| | पुर्णांकात | रु.१,००,००,०००/- |

२. उपरोक्त अंदाजपत्रकाची प्रशासकीय मान्यता खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

२) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि. १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

३) सदर बांधकामाचा खर्च सार्वजनिक आरोग्य विभागाने त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या नियतव्ययामधून करण्यात यावा.

४) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमा-२, दि.०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

५) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

६) सदर अंदाजपत्रकास मुख्य अभियंता अथवा सक्षम प्राधिकाऱ्यांची मान्यता घेण्यात यावी.

३. सदर कामावरील खर्च पुढील लेखाशीर्षामधील उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा :-

**मागणी क्र.एच-८, मुख्यलेखाशिर्ष**

"४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१- नागरी आरोग्य सेवा (वैद्यकिय सहाय्य)
११०- रुग्णालये व दवाखाने
(१) (अ)- पंचवार्षिक योजनातंर्गत योजना - इमारती
(००) (०१)- मोठी बांधकामे (४२१० ००१४)
५३- मोठी बांधकामे "

४. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाने दि.२५.०६.२०१९ आणि वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १ येथील परिच्छेद क्र.१३४ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७२९१६३३१३०७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip M Balkavde

Digitally signed by Pradip M Balkavde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=8db6aab31faca2f1a89698a28c94703436c07cda664672d20607766dc59d345b, serialNumber=ed0fa40788bb5c0d7f76b869fa2e5835af215c6a80eae8f70eaf87b0cf68d63f, cn=Pradip M Balkavde
Date: 2020.08.17 15:40:09 +05'30'

प्र. मो. बलकवडे

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ / २, मुंबई/ नागपूर.
२. संचालक आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.
३. संचालक आरोग्य सेवा-२, आरोग्य सेवा आयुक्तालय, पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
५. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
६. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
७. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर.
८. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, सिंधुदूर्ग.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदूर्ग.
१०.जिल्हा महिला व बाल रुग्णालय, सिंधुदूर्ग-कुडाळ.
११.जिल्हा आरोग्य अधिकारी, सिंधुदूर्ग.

१२.सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई
१३.वित्त विभाग (विनियम कार्यासन ), मंत्रालय, मुंबई.
१४.अवर सचिव (अर्थसंकल्प), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई
१५.निवडनस्ती( आरोग्य-४ ), सा.आ.वि.